**प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेतील**
**कार्यक्रमाची अंमलबजावणी.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक-जिपर २०००/प्र.क्र.१३३/३५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १७ जानेवारी २००२

**संदर्भ** :-१) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाच्या दि.१५ डिसेंबर २००० अन्वये प्राप्त झालेल्या मार्गदर्शक सूचना.
२) शासन परिपत्रक , सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.निविदा/ १०/२०००/प्र.क्र.५०२/ इमारती-२, दि.२५ ऑक्टोबर,२०००
३) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.जिपर २०००/प्र.क्र.१३३/३५, दिनांक ३१ मार्च, २००१.
४) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जिपर-२०००/ प्र.क्र.१३३/३५, दिनांक २८ सप्टेंबर, २००१.

**प्रस्तावना** :-

केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाने देशातील विविध राज्यातील ग्रामीण भागातील खेडी / गावे बारमाही रस्त्यांनी जोडण्याची "प्रधान मंत्री ग्राम सडक योजना" जाहीर केली असून त्याअंतर्गत रस्ते बांधणी व रस्त्यांचा दर्जा सुधारणीचा कार्यक्रम सन २००० ते २००७ पर्यन्त अंमलात आणावयाचे धोरण निश्चित केले आहे. या संदर्भात केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाने प्रसृत केलेल्या मार्गदर्शक सूचना (Guide Lines) नुसार कार्यान्वयन समिती, कार्यक्रम अंमलबजावणी पथक इत्यादींची स्थापना करणे व रस्ते बांधणीचा आराखडा तयार करणे याबाबत स्पष्ट सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सन २००१ ते योजनेच्या अंतिम टप्प्यापर्यन्त (२००७ पर्यन्त) कार्यक्रमाची अंमलबजावणी ग्राम विकास विभागाने जिल्हा परिषदांच्या बांधकाम विभागातील यंत्रणेमार्फत राबविण्याचा निर्णय राज्यशासनाने घेतला आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार योजनेची प्रभावीपणे व विहित कालावधीत अंमलबजावणी होण्यासाठी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत.



GR-20020122160702000-1200

## शासन निर्णय :-

### कार्यान्वयन समिती (Executing Agency) स्थापन करणे :-

योजनेतील कार्यक्रमाची आखणी, संचलन, अंमलबजावणी करण्यासाठी सर्व जिल्हा स्तरावर अस्तित्वात असलेल्या व तांत्रिकदृष्ट्या सक्षम अशी कार्यान्वयन समिती स्थापन करण्याच्या सूचना मार्गदर्शक तत्वांमध्ये आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे कार्यान्वयन समितीची स्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| १) मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद | समिती प्रमुख |
| २) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग संबंधित जिल्हा परिषद | सदस्य |
| ४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संबंधित ( राज्यक्षेत्र)(संबंधित अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ यांनी नियुक्त केलेले) | सदस्य |
| ५) प्रकल्प संचालक, संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | सदस्य |

वरील समितीने जिल्हा व तालुकास्तरावर होणा-या रस्तेबांधणी, दर्जा सुधारणी इ.कामावरील तांत्रिक नियंत्रण व देखरेख ठेवणे, कार्यक्रम अंमलबजावणी पथकाकडून कामासाठी मागविण्यात येणा-या निविदांच्या संदर्भात मार्गदर्शन व देखरेख ठेवणे ही कामे या समितीने करणे आवश्यक आहे.

### कार्यक्रम अंमलबजावणी पथक (Programme Implementation Unit)स्थापन करणे :-

सन २००१-२००२ व त्यापुढील कालावधीत योजनेतील कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी (Execution) करणे, त्यासाठी प्रकल्प प्रस्ताव व जिल्हा बृहत आराखडा तयार करणे, निविदा प्रक्रिया पूर्ण करणे इत्यादी कामांसाठी कार्यकारी अभियंता व त्यापेक्षा वरिष्ठ दर्जाच्या अधिका-यांचा समावेश असलेल्या कार्यक्रम अंमलबजावणी पथकाची स्थापना करण्याच्या सूचना मार्गदर्शक तत्वामध्ये विहित आहेत. त्यानुसार सन



GR-20020122160702000-1200

२००१-२००२ ते योजनेच्या अंतिम टप्प्यापर्यन्त खालीलप्रमाणे कार्यक्रम अंमलबजावणी पथक स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

१) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, संबंधित जिल्हा परिषद - पथक प्रमुख

२) मुख्य लेखा व वित्त अधिकारी - विशेष निमंत्रित (निविदा प्रक्रिया)

३) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, संबंधित जिल्हे - सदस्य

४) उप अभियंता / शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता, बांधकाम विभाग, संबंधित जिल्हा परिषद व पंचायत समित्या - सदस्य

कार्यक्रम अंमलबजावणी पथकामध्ये निविदा प्रक्रियेसाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी हे विशेष निमंत्रित असतील. निविदा प्रक्रियेच्या आरंभापासून ते निविदा प्रक्रियेच्या अंतिम मंजुरी पर्यन्तच्या कार्यवाहीत ते सहभागी राहतील. त्यांच्या उपस्थितीशिवाय करण्यात आलेली निविदा प्रक्रिया ग्राहय धरली जाणार नाही.

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या पत्र क्र.बीजीएन-२००१/प्रक्र.११०/ अर्थ-१, दि. २७.८.२००१ अनुसार संस्थापित कार्यक्रम अंमलबजावणी पथकांनाही या निर्णयानुसार मान्यता देण्यात येत आहे. आवश्यकतेनुसार उपरोक्त कार्यान्वयन समितीने जिल्हयात सार्वजनिक बांधकाम विभागाकडील कार्यक्रम अंमलबजावणी पथकास काम देण्याबाबत निर्णय करावा.

जिल्हयात एकापेक्षा जास्त जिल्हा परिषद कार्यकारी अभियंत्यांची पदे असल्यास कामाचे प्रमाण, मुख्यालय निवास, जेष्ठता इत्यादी बाबींचा विचार करुन एका कार्यकारी अभियंत्यांस मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी Nodal Executive Engineer या पदी नेमावे. कार्यक्रमाची प्रगती व हिशेबास Nodal Executive Engineer जबाबदार राहतील. उर्वरित कार्यकारी अभियंत्यांना Territorial Executive Engineer असे संबोधण्यात येईल.



GR-200201221607020000-1208

**निविदा प्रक्रिया (Tendering / Bidding Procedure) :-**

प्रधानमंत्री ग्राम सडक योजना या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा प्रमुख सुत्रधार आहे. केंद्र शासनाने या योजनेसाठी स्थानिक स्वराज्य संस्था व महाराष्ट्र शासन यांच्या सहयोगाचीही अपेक्षा ठेवलेली आहे. रस्त्यांच्या निवड प्रक्रियेत पंचायत समितीपासून ते जिल्हा स्तरापर्यन्त सर्व स्तरीय लोकनियुक्त प्रतिनिधींचा सहभाग रस्ते निवड पध्दतीचा अनिवार्य भाग आहे.

महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ अन्वये जिल्हा परिषदांकडील विविध विकास कामे पार पाडण्यासाठी आराखडे व अंदाजपत्रकाना मान्यता देणे, तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देणे, निविदा प्रक्रिया व त्या संदर्भात आवश्यक मंजूरी इत्यादी प्रक्रिया विहित केल्या आहेत. तसेच, सार्वजनिक बांधकाम विभागाकडील विविध प्रकारच्या बांधकामांसाठी, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम "नियम पुस्तिका" अन्वये बांधकाम संहिता विहित केली असूनही संहिता जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखासंहिता, १९६८ मधील चॅप्टर-५, नियम ९९ (Note) अन्वये जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांच्या बांधकामांसाठी लागू करण्यात आल्या आहेत. प्रस्तावित "प्रधान मंत्री ग्राम सडक" योजनेतील रस्ते बांधणी, दर्जा सुधारणी, इत्यादी कार्यक्रम महाराष्ट्र जिल्हा परिषद पंचायत समित्या अधिनियम, १९६१ मधील विहित तरतुदींचा अवलंब करुन, निविदा प्रक्रिया पूर्ण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) योजनेतील कामांसाठी निविदा मागविणे व प्रचलित कार्यपध्दतीनुसार ती मंजूरीसाठी विहित कालावधीत सादर करण्याची प्रक्रिया कार्यक्रम अंमलबजावणी पथकाने पार पाडणे आवश्यक राहील.

२) प्रस्तावित योजनेतील कामांसाठी निविदा मागविताना निविदाकारांची पूर्व अर्हता निश्चित करण्याच्या संदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने परिपत्रक क्र.निविदा-१०/२०००/प्र.क्र.५०२/इमारती-२, दि.२५ ऑक्टोबर, २००० अन्वये व या संदर्भात तद्नंतर निर्गमित केलेल्या आदेशातील तरतूदीनुसार कंत्राटदारांची पूर्व अर्हता निश्चित करण्याचे नियम लागू असतील.



GR-200201221607082000-1200

३) योजनेसाठी रुपये १ ते ५ कोटी पर्यन्तच्या कामाची पॅकेजेस करण्यात आली आहेत. निविदा मागविताना कामाच्या किंमतीनुसार २ वर्ग करण्यात यावेत. रुपये १ ते ३ कोटी पर्यन्तची पॅकेजेस पहिल्या वर्गात ठेवून ३ कोटी वरील पॅकेजेससाठी दुस-या वर्गात स्थान देण्यात यावे.

४) उपरोक्त दोन्ही वर्गातील निविदांसाठी दोन लिफाफयांच्या पध्दतीचा अवलंब करुन पूर्व अर्हता ठरवावी. सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका व या संदर्भातील सुधारीत आदेश / नियमांतील कंत्राटदारांच्या पूर्व अर्हता निश्चित करण्याच्या प्रचलित पध्दतीनुसार फक्त पूर्व अर्हतेच्या अटी पूर्ण करणा-या निविदांची दुसरी पाकिटे अंतिमतः उघडण्यात यावीत, पूर्व अर्हतेच्या अटी पूर्ण न करणा-या निविदा उघडण्यात येऊ नये.

५) सदर योजनेत कालबध्दरित्या कार्यपूर्ती करावयाची असल्याने व वेळेत काम पूर्ण न झाल्यास अतिरिक्त खर्चाचा बोजा राज्य शासनावर येणार असल्यामुळे निविदेची प्रक्रिया व कालावधी खाली दिल्याप्रमाणे असावा.

निविदेचा एकंदरीत कालावधी ३३ दिवसांचा असेल.

अ) निविदा जाहीर केल्यापासून ५ व्या दिवशी कार्यक्रम अंमलबजावणी पथकाने निविदाकारांना तांत्रिक बाबींवर माहिती देण्यासाठी व शंका समाधानासाठी सभा घ्यावी. ५ वा दिवस सुट्टीचा असल्यास त्यानंतरच्या कार्यालयीन दिवशी सभा घेण्यात यावी. कार्यक्रम अंमलबजावणी पथकाने केलेला खुलासा व निविदेतील बदल (कॉमन सेट ऑफ डेव्हीएशन) हे निविदेचा एक भाग म्हणून समजण्यात यावे व तसा खुलासा निविदाकारांना करावा.

ब) उपरोक्त सभेनंतर ३ आठवडयांनी व कोणत्याही परिस्थितीत जाहिरातीच्या पहिल्या दिवसापासून २६ व्या दिवशी निविदा स्विकृतीचा अंतिम दिवस राहील. यापूर्वीच निर्देशित केल्याप्रमाणे निविदा २ लिफाफयात असतील. पैकी पूर्व अर्हता ठरविण्याचा पहिला लिफाफा २६ व्या दिवशी समिती सर्वांसमोर उघडेल. समितीच्यावतीने कार्यकारी अभियंता व मुख्य लेखा व वित्त अधिकारी हे प्रत्येक पान साक्षांकित करतील. दुसरा

लिफाफा कार्यक्रम अंमलबजावणी पथक प्रमुख यांचेकडे एकत्रितपणाने मोहोरबंद स्थितीत राहील.

क) यानंतर एक आठवडयाने म्हणजे ३३ व्या दिवशी आयुक्तांच्या पूर्व मान्यतेने पहिल्या लिफाफयावरील पूर्व अर्हतेबाबत निर्णय जाहीर करण्यात येईल व अर्हता प्राप्त निविदा जाहीरपणे उघडण्यात येऊन तुलनात्मक तक्ता तयार करण्यात येईल.

निविदा न उघडण्याची कारणे पहिले अर्हता पाकीट उघडल्यानंतर विभागीय आयुक्तांच्या पूर्व मान्यतेने कार्यक्रम अंमलबजावणी पथक सात दिवसानंतर जाहिर करेल. आयुक्तांनी निर्णयासाठी मुख्य अभियंता यांचा सल्ला घ्यावा.

ड) अर्हता प्राप्त न झालेल्या निविदाकारांचा दुसरा लिफाफा न उघडता एकत्र सीलबंद लिफाफयात समितीच्या सदस्यांच्या सहीनिशी दफ्तरी दाखल करण्यात येईल.

इ) या नंतरच्या आठवडयात मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषदेच्या स्थायी समितीची सभा बोलावतील व समितीने तयार केलेला तुलनात्मक तक्त्यातील कमीत कमी दराच्या निविदेस समितीची मान्यता घेण्याबाबत प्रस्ताव सादर करतील.

स्थायी समितीने प्रस्तावास मान्यता न दिल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी सदर बाब स्थायी समितीच्या अभिप्रायांसह विभागीय आयुक्तांकडे कळवतील. विभागीय आयुक्त मुख्य अभियंत्यांच्या सल्ल्याने निविदेस मान्यता देतील. ही प्रक्रिया ३ दिवसात पूर्ण करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

६) स्थायी समितीने निविदा मंजूर केल्यानंतर नजिकच्या कालावधीत होणा-या जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेपुढे सदर निर्णय माहितीस्तव सादर करण्यात येईल.

**<u>तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेबाबत</u>**

१) या सर्व कामाच्या एकत्रित स्वरुपात निविदा काढावयाच्या असल्याने व काम रस्त्यांचे म्हणजेच एकाच प्रकारचे असल्याने या एकत्रित निविदाचे प्रारुपास त्याची किंमत रु.१ ते ३ कोटीपर्यन्त असल्यास अधिक्षक अभियंता व रु.३ कोटी पेक्षा जास्त असल्यास मुख्य अभियंता यांनी मान्यता प्रदान करावी.

Gr 133

तथापि राज्य तांत्रिक संस्थेने यापूर्वीच तांत्रिक बाबतीत १०० टक्के परिक्षण करुन मान्यता दिलेली असल्याने उपरोक्त अधिका-यांनी किमान ५ टक्के अनिवार्य तपासणी करुन त्यांचेकडे प्रस्ताव सादर झाल्यापासून एक आठवडयात निविदा प्रारुपास मान्यता दयावी. राज्य तांत्रिक संस्थेने दिलेली तांत्रिक मान्यता रद्द करावयाची असल्यास सदर संबंधित संस्थेशी विचारविनिमय करुन लेखी कारणांसह मान्यता रद्द करण्याचे अधिकार मुख्य अभियंता यांना असतील.

२) योजनेतील कामांसाठी रुपये एक ते पाच कोटी पर्यन्तच्या खर्चाच्या निविदा स्विकृतीचे अधिकार जिल्हा परिषदांच्या स्थायी समितीस असतील. शासन निर्णय ,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.झेडपीए-२०००/प्र.क्र.४०२३/३३, दिनांक १२.१.२००१ च्या शासन निर्णयात सुधारणा करुन केवळ प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेसंदर्भात सदर अधिकार स्थायी समितीस देण्यात येत आहेत.

<u>गुणात्मक दर्जाबाबत</u> ( Quality Assurance)

१) मागील सन २०००-२००१ वर्षी राज्याच्या सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत निश्चित केलेल्या गुणात्मक दर्जा पुस्तिके (Quality Assurance Mannual) अन्वये निश्चित केलेली मानके यापुढे देखील लागू राहतील. Quality Assurance Mannual नुसार कामाच्या दर्जाबाबत कार्यपध्दती अनुसरावयाची असून सर्वोत्तम गुणात्मकता हे या कार्यक्रमाचे ध्येय राहिल.

२) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांमधील महत्वपूर्ण परिच्छेद क्रमांक ४.४ खालीलप्रमाणे असून, सदर कामे जबाबदारीने विहित कालावधीत पूर्ण करण्यासाठी पुन्हा विशेष करुन नमूद करण्यात येत आहे. त्यानुसार जबाबदारपणे विहित कालावधीत काम पूर्ण करावे :-

योजनेच्या मार्गदर्शक तत्वात परि.क्र.४.४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर कामे विहित कालावधीत पूर्ण करावी लागणार आहेत. विहित कालावधीत कामे पूर्ण न झाल्यास वाढीव अनुदान शासनाकडून दिले जाणार नाही. हे लक्षात घेऊन निविदा प्रक्रियेमध्ये कार्यान्वयीन यंत्रणेने सदर मार्गदर्शक तत्वाचा स्पष्ट उल्लेख करुन संबंधितांवर जबाबदारी



GR-20020122 160702000-1200

निश्चित करावी. योजनेतील विलंब अथवा कामातील दिरंगाई यामुळे कंत्राटदारास अतिरिक्त रक्कम कोणत्याही स्थितीत देता येणार नाही, काम निहित वेळेतच पूर्ण करावे असा स्पष्ट उल्लेख करारात करावा.

३) सन २०००-२००१ या सालाकरिताच्या योजनेच्या अंमलबजावणीकरिता आवश्यक असणा-या निविदा पेपर्सचा मसुदा राज्याच्या सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत बनविण्यात आला आहे. सदर निविदा पेपर्समध्ये या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे आवश्यक ते सुसंगत बदल करण्यात यावेत. या शासन निर्णयातील तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेबाबतच्या मुद्यातील परि.१ येथे नमूद केल्याप्रमाणे निविदा पेपर्स जर रु.१ ते ३ कोटी दरम्यानचे असल्यास त्या निविदेच्या पेपर्समध्ये या शासन निर्णयाशी सुसंगत बदल संबंधित अधिक्षक अभियंत्यांमार्फत करण्यात यावेत व रु.३ कोटी पेक्षा अधिक रक्कमेचे निविदा पेपर्समध्ये शासन निर्णयाशी सुसंगत बदल संबंधित मुख्य अभियंत्यांव्दारे करण्यात यावेत.

४) सदर निर्णयात नमूद केलेल्या प्रक्रियेत कोणत्याही तांत्रिक अथवा अभियांत्रिकी अडचणी उद्‌भवल्यास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियम पुस्तिके सन १९८४ प्रमाणे त्याचे निरसन करण्यात यावे.

५) या संदर्भात लेखा किंवा वित्त विभागाविषयी अडचणी आल्यास महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती लेखा संहिता १९६८ मधील तरतुदीप्रमाणे निरसन करण्यात यावे.

केंद्र शासनाने उपरोक्त कार्यक्रम नियत कालावधीत पूर्ण करण्याच्या सूचना दिल्या असल्यामुळे जिल्हा परिषद स्तरावर प्रशासकीय मान्यता मिळणे, निविदा प्रक्रिया पूर्ण करणे या संदर्भात विलंब होऊ नये त्याकरिता वरीलप्रमाणे निविदा प्रक्रियाच्या संदर्भात या शासन निर्णयान्वये विशेष सूचना देण्यात येत आहेत.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४७६ /सचिव/रस्ते दिनांक ९.१.२००२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक,

 GR-200201221607020000-1200

133

प्रक्र.१४/व्यय-१५,दिनांक १.१.२००२ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

17/1

( सुनील पाटील )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई३२
सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर
विभागीय आयुक्त (सर्व विभाग)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती,
जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
संचालक(लेखा व कोषागारे), लेखा व कोषागार संचालनालय, मुंबई-२१
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई,पुणे,नाशिक,
औरंगाबाद,अमरावती,नागपूर,(विशेष प्रकल्प) मुंबई, राष्ट्रीय महामार्ग
विभाग,कोकण भवन,नवी मुंबई
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ (सर्व)
अधिक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ (सर्व)
कार्यकारी अभियंता( सार्वजनिक बांधकाम),जिल्हा परिषद सर्व
मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे स्वीय सहाय्यक
मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
मा. मंत्री (नियोजन) यांची स्वीय सहाय्यक
अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
जिल्हा कोषाधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व)
निवड नस्ती, कार्या.क्र.३५,ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

A:Gr 133 GR-200201221607020000-1200